**सन २०१९-२० या वर्षात प्रधानमंत्री कृषी सिंचन योजनेच्या- प्रति थेंब अधिक पीक घटकांतर्गत सुक्ष्म सिंचन बाबीची सर्वसाधारण प्रवर्गासाठी अंमलबजावणी करण्यासाठी राज्य हिश्श्याचा रु.२३.९३ कोटी निधी वितरीत करणे...**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः प्रकृसिं-०११९/प्र.क्र.४१ (भाग-१)/१४अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई-४०००३२
तारीख: १२ मार्च, २०२०

**संदर्भ :-**

१. केंद्र शासनाच्या कृषी व शेतकरी कल्याण मंत्रालयाचे पत्र क्र.१७-३/२०१९-आरएफएस-III, दि.४ जुन, २०१९.
२. केंद्र शासनाच्या कृषी व शेतकरी कल्याण मंत्रालयाचे पत्र क्र.१८-१२/२०१८-आरएफएस-III, दि.२० ऑगस्ट, २०१९
३. कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्रमांकः प्रकृसिं-०११९/प्र.क्र.४१/१४अे , दि.३० ऑगस्ट, २०१९.
४. कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्रमांकः प्रकृसिं-०११९/प्र.क्र.४१ (भाग-१)/ १४अे , दि.११ नोव्हेंबर, २०१९.

**प्रस्तावना:**

प्रधानमंत्री कृषि सिंचन योजनेंतर्गत- प्रति थेंब अधिक पीक घटकाची अंमलबजावणी राज्यात करण्यात येत आहे. सदर घटकांतर्गत सुक्ष्म सिंचन व पाणी व्यवस्थापनाच्या पुरक बाबी या दोन बाबी राबविण्यात येतात. यामध्ये केंद्र व राज्य हिश्श्याचे प्रमाण ६०:४० असे आहे.

केंद्र शासनाने संदर्भाधीन दि.२० ऑगस्ट, २०१९ च्या पत्रान्वये प्रति थेंब अधिक पीक घटकांतर्गत सुक्ष्म सिंचन या बाबीच्या अंमलबजावणीसाठी रु.१७४ कोटी एवढा निधी वितरीत केला आहे. यामध्ये, सर्वसाधारण प्रवर्गासाठी रु.१३५.७२ कोटी, अनुसूचित जाती प्रवर्गासाठी रु.२०.८८ कोटी व अनुसूचित जमाती प्रवर्गासाठी रु.१७.४० कोटी रकमेचा समावेश आहे.

केंद्र शासनाने वितरीत केलेला सर्वसाधारण प्रवर्गाचा रु.१३५.७२ कोटी व राज्य हिश्श्याचा रु.६६.५५ कोटी असा एकूण रु.२०२.२७ कोटी निधी संदर्भाधीन दि.११ नोव्हेंबर, २०१९ च्या शासन निर्णयान्वये आयुक्त (कृषि) यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आला आहे. केंद्र हिश्श्याच्या प्रमाणात राज्य हिश्श्यासाठी आवश्यक असलेला उर्वरित रु.२३.९३ कोटी निधी आयुक्त (कृषि) यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. अनुषंगाने खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे.

**<u>शासन निर्णय :</u>**

१. सन २०१९-२० या वर्षात प्रधानमंत्री कृषी सिंचन योजनेच्या- प्रति थेंब अधिक पीक घटकांतर्गत सुक्ष्म सिंचन बाबीची सर्वसाधारण प्रवर्गासाठी अंमलबजावणी करण्यासाठी राज्य हिश्श्याचा रु.२३.९३ कोटी (अक्षरी रुपये तेवीस कोटी त्र्याण्णव्व लाख फक्त) निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर (बीडीएस) आयुक्त (कृषी) यांना वितरीत करण्यात येत आहे.

२. सदर खर्च खालील लेखाशिर्षाखालील सन २०१९-२० च्या मंजुर तरतुदीतून भागविण्यात यावा.

मागणी क्र.डी-३,
२४०१, पिक संवर्धन,
११३ कृषि अभियांत्रिकी
(००)(२१) प्रधानमंत्री कृषी सिंचन योजना -
(सूक्ष्म सिंचन) (राज्य हिस्सा ४० टक्के),
(सर्वसाधारण) (२४०१ एए९६),
३३ अर्थसहाय्य.

३. सदर योजनेंतर्गत वितरीत करण्यात येणाऱ्या निधीच्या आहरण व संवितरणासाठी पुढीलप्रमाणे नियंत्रण तसेच आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे:-

| अ.क्र | स्तर | नियंत्रण अधिकारी | आहरण व संवितरण अधिकारी |
|---|---|---|---|
| १ | आयुक्तालय स्तर | आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, पुणे | सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे |
| २. | जिल्हास्तर | संबधित जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी | संबधित जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी कार्यालयातील लेखाधिकारी. |

४. वितरीत करण्यात आलेला निधी खर्च करताना प्रधानमंत्री कृषी सिंचन योजनेंतर्गत - प्रति थेंब अधिक पिक (सूक्ष्म सिंचन) घटकाच्या मार्गदर्शक सूचना, संदर्भाधीन दि.३० ऑगस्ट, २०१९ च्या शासन निर्णयातील सूचना त्याचप्रमाणे केंद्र शासनाच्या संदर्भाधीन दि.२० ऑगस्ट, २०१९ च्या पत्रातील सूचनांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

५. अनुदानाची रक्कम लाभार्थ्यांच्या आधार संलग्न बँक खात्यावर PFMS प्रणालीद्वारे जमा करावी.

६. सदर निधी खर्च करताना तो विहीत कार्यपद्धती अनुसरुन सर्व वित्तीय कायदे/प्रकियाचे/ वित्तीय अधिकारांच्या मर्यादेत/C.V.C तत्वानुसार/प्रचलित शासन निर्णय/ नियम/ परिपत्रक/तरतुदीनुसार, बजेट व कोषागार नियमावलीनुसार खर्च करण्याची कार्यवाही अंमलबजावणी यंत्रणानी करावी. कोणत्याही परिस्थितीत कुठलाही शासन नियम/ अधिकाराचा भंग होणार नाही, याबाबत दक्षता घेण्याची जबाबदारी संबधित क्षेत्रीय कार्यालयाची राहील.

७. सदर निधीच्या खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र केंद्र शासनास पाठवून त्याची प्रत राज्य शासनास पाठविण्यात यावी.
८. सदर शासन निर्णय वित्त विभागाने त्यांचा अनौ. सं. क्र.५२/२०२०/व्यय-१, दि.२८ फेब्रुवारी, २०२० अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००३१२१४५२२१७१०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shrikant Chandrakant Andge

Digitally signed by Shrikant Chandrakant Andge
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture and ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5d5ab93b4e4f2fcd87e12fe19b8965025d482b1bee0fffaa62085c34db6bfd8c, serialNumber=d8d9626c9e038380cd235c048f20d7ce74cffd3a95f2ac3c192e9c991f358271, cn=Shrikant Chandrakant Andge
Date: 2020.03.12 15:00:07 +05'30'

**( श्रीकांत आंडगे )**
**अवर सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.मंत्री (कृषी/फलोत्पादन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा.राज्यमंत्री (कृषी/फलोत्पादन) यांचे खाजगी सचिव मंत्रालय, मुंबई.
३) प्रधान सचिव (कृषी) यांचे स्विय सहायक, मंत्रालय, मुंबई.
४) प्रधान सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) सचिव (जलसंधारण व रोजगार हमी योजना), ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
६) सचिव (ला.क्षे.वि.), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
७) आयुक्त (कृषी),कृषी आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे.
८) संचालक (फलोत्पादन), कृषी आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे.
९) जिल्हाधिकारी (सर्व)
१०) मुख्य कार्यकारी अधिकारी,वसुंधरा पाणलोट विकास यंत्रणा,पुणे
११) संशोधन संचालक, महात्मा फुले कृषी विद्यापीठ, राहुरी
१२) संशोधन संचालक, वसंतराव नाईक मराठवाडा कृषी विद्यापीठ, परभणी
१३) संशोधन संचालक, डॉ.बाळासाहेब सावंत कोकण कृषी विद्यापीठ, दापोली
१४) संशोधन संचालक, डॉ.पंजाबराव देशमुख कृषी विद्यापीठ, अकोला
१५) सर्व संचालक, कृषी आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे
१६) संचालक, कृषी हवामान शास्त्र विभाग, पुणे.
१७) भारतीय हवामान शास्त्र विभाग, पुणे.
१८) विभाग प्रमुख, एकात्मिक जल व्यवस्थापन, महात्मा फुले कृषी विद्यापिठ, राहुरी

१९) विभाग प्रमुख, सिंचन व निचरा अभियांत्रिकी, महात्मा फुले कृषी विद्यापिठ, राहुरी
२०) विभाग प्रमुख, सिंचन व निचरा अभियांत्रिकी, वसंतराव नाईक मराठवाडा कृषी विद्यापिठ, परभणी
२१) विभाग प्रमुख, सिंचन व निचरा अभियांत्रिकी, डॉ बाळासाहेब सावंत कोकण कृषी विद्यापिठ, दापोली
२२) विभाग प्रमुख, सिंचन व निचरा अभियांत्रिकी, डॉ.पंजाबराव देशमुख कृषी विद्यापिठ, अकोला
२३) सर्व विभागीय कृषी सहसंचालक
२४) जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी (सर्व)
२५) सर्व कृषी विकास अधिकारी/सर्व उपविभागीय कृषी अधिकारी/सर्व तालुका कृषी अधिकारी/
२६) सर्व मंडळ कृषी अधिकारी
२७) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
२८) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षण) महाराष्ट्र -१/२ मुंबई/नागपुर
२९) संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई
३०) संचालक, लेखा व कोषागार, मुंबई
३१) मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई, वाशी.
३२) उप मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा,कोकण/ नाशिक/ पुणे/ औरंगाबाद/ अमरावती/ नागपुर
३३) उप संचालक, लेखा व कोषागारे कोकण /नाशिक /पुणे/ औरंगाबाद/ अमरावती/ नागपुर
३४) सर्व कार्यासने व पर्यवेक्षिय अधिकारी (कृषी) कृषी व पदुम विभाग, मंत्रालय,मुंबई-३२
३५) निवडनस्ती.